**प्रमाणित लेखापरीक्षकांमार्फत लेखापरीक्षण होणाऱ्या सहकारी संस्थांचे लेखापरीक्षण कार्यालयीन लेखापरीक्षकांकडे सोपविण्याबाबत मंजूर केलेली अस्थायी कर्मचाऱ्यांची पदे चालू ठेवण्याबाबत.**

---

**नागरी बँकांचे लेखापरीक्षण.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : युआरबी-१८०९/प्र.क्र. २९७(भाग २)/७-स**
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- २४ सप्टेंबर, २०१८.

<u>**पहा :-**</u> १) शासन निर्णय क्र. राजस १००८/प्र.क्र.५३८/५-स , दि.५ मे, २०११.

२) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्रमांक युआरबी-१८०९/प्र.क्र. २९७(भाग-२)/ ७-स, दि. १३ मार्च, २०१८.

३) शासन निर्णय वित्त विभाग क्रमांक पदनि २०१६/प्र.क्र.०८/१६/ आ.पु.क., दि. ०७ सप्टेंबर, २०१८

<u>**शासन निर्णय**</u> :-

उपरोक्त क्रमांक २ येथील दिनांक १३ मार्च, २०१८ च्या शासन निर्णयान्वये नागरी सहकारी बँकांमधील लेखापरीक्षण कर्मचाऱ्यांच्या एकुण ५९ अस्थाई पदांना दिनांक ३० सप्टेंबर, २०१८ पर्यंत चालु ठेवण्यास शासनाने मंजूरी दिली होती. सदर मुदत संपुष्टात आलेली असून सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी सादर केलेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने सन २०१८-१९ मध्ये एकुण ५९ पदे पुढे चालु ठेवण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

२. विभागांतर्गत मंजूर स्थायी / अस्थायी पदांचा सुधारित आकृतीबंध निश्चित करण्याच्या कार्यवाही अंतर्गत नागरी सहकारी बँकांच्या सतत व समवर्ती लेखापरीक्षकाच्या पदांच्या सुधारित आकृतीबंधास उच्चस्तरीय सचिव समितीची मान्यता मिळाली असून त्यासंबंधीचा शासन निर्णय क्रं. राजस १००८/ प्र.क्र./५३८/५-स दि.५.५.२०११ रोजी निर्गमीत करण्यात आलेला आहे. यात उक्त ५९ पदांचा समावेश आहे. ९७ व्या घटना दुरुस्तीनुसार कायद्यात झालेले बदल पाहता आकृतीबंधातील मंजुरीनुसार लेखापरीक्षण विभागातील एकुण ३९९५ पदांच्या पुर्नरचनेच्या प्रस्तावाची छाननी करण्याचे काम चालु असुन या छाननीस अवधी लागणार असल्याचे नमुद करून सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी नागरी सहकारी बँकेच्या लेखापरीक्षणासाठी असलेल्या ५९ पदांना सन २०१८-१९ मध्ये चालु ठेवण्याबाबतचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे. वित्त विभागाच्या

दि. ५.३.२०१८ च्या शासन निर्णयानुसार प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार नागरी सहकारी बँकेच्या लेखापरिक्षणासाठी असलेल्या विवरण पत्र 'अ' मधील ५९ अस्थायी पदांना दि. १.१०.२०१८ पासून दि. २८.०२.२०१९ पर्यंत चालू ठेवण्यास याद्वारे शासन मंजुरी देण्यांत येत आहे.

३. लेखापरीक्षण शुल्काची (ऑडिट फी) वसुली करण्याची पूर्णत: दक्षता सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी घ्यावी. तसेच लेखापरीक्षणासाठीच्या कर्मचाऱ्यांची किमान वेतनाइतके लेखापरीक्षण शुल्क वसुलीची कार्यवाही तात्काळ करावी व पुढील मुदतवाढीचा प्रस्ताव सादर करताना लेखापरीक्षण शुल्काची एकुण संचित थकबाकी पुर्णपणे वसूल झालेली असावी.

४. वर नमूद केलेल्या नागरी बँकांसंदर्भात पदांचे जिल्हावार वाटप सोबतच्या विवरण पत्र 'अ' मध्ये दर्शविलेले आहे. सदर पदांच्या आहरण व संवितरण अधिकारी निहाय वाटपाबाबतचा तपशिल सहकार आयुक्त व निबंधक सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी महालेखापाल, महाराष्ट्र-१, महालेखापाल, महाराष्ट्र-२, अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई व संबंधित जिल्हा कोषाधिकारी यांना थेट पाठवावा व त्यांची एक प्रत माहितीसाठी शासनास पाठवावी.

५. उपरोक्त सर्व कर्मचारी वृंदावर होणारा खर्च संबंधित सहकारी संस्थांकडून लेखापरीक्षण फीच्या स्वरूपात वसूल करण्यात आलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा. लेखापरीक्षण शुल्क पुर्णत: वसूल होण्याची दक्षता सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी घ्यावी.

६. या प्रित्यर्थ होणारा खर्च हा सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मागणी क्रमांक - व्ही-२ , मधील अर्थसंकल्पीय लेखाशिर्ष "२४२५-सहकार, (००) १०१ सहकारी संस्थाची लेखापरीक्षा, (०१)(०१) लेखापरीक्षेसाठी कर्मचारी वर्ग- (२४२५ ०२२ ७)" या लेखाशिर्षाखाली सन २०१८-१९ या आर्थिक वर्षासाठी केलेल्या तरतूदीमधून भागविण्यात यावा.

७. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या दिनांक ७/०९/२०१८ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८०९२४१६१८४७७००२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने स्वाक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Ramesh Shankarrao Shingte

Digitally signed by Ramesh Shankarrao Shingte
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Co-Operation, Marketing And Textile Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fed1b2ed6e1e4aca719170d9eae8aa251ee28dc56c75d8a65acb34103d45bd48, cn=Ramesh Shankarrao Shingte
Date: 2018.09.24 16:23:49 +05'30'

**(रमेश शिंगटे)**

अवर सचिव तथा सहनिबंधक, महाराष्ट्र शासन

**सहपत्रे :-** विवरण पत्र -अ॰

**प्रत :-**

१) महालेखापाल, महाराष्ट्र-१, (लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) मुंबई (२ प्रती).

२) महालेखापाल, महाराष्ट्र-२, (लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) नागपूर (२ प्रती).

३) वित्त विभाग, कार्यासन व्यय-२, मंत्रालय, मुंबई.

४) कार्यासन अधिकारी, १७-स, ५-स, १२-स, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग.

५) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.

६) विभागीय सहनिबंधक सहकारी संस्था (सर्व).

७) सहनिबंधक, सहकारी संस्था (लेखापरीक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे.

८) सहनिबंधक सहकारी संस्था (लेखापरीक्षण), (नागरी बँका) महाराष्ट्र राज्य, पुणे (५ प्रती)

९) जिल्हा उपनिबंधक सहकारी संस्था (सर्व).

१०) जिल्हा विशेष लेखापरीक्षक, वर्ग § १, सहकारी संस्था (लेखापरीक्षण) (सर्व).

११) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.

१२) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.

१३) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.

**महाराष्ट्र शासन**

**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**

**शासन निर्णय क्रमांक:- युआरबी-१८०९/ प्र.क्र. २९७(भाग-२)/७-स, दि. २४ सप्टेंबर, २०१८.**

**विवरण पत्र - अ**

**जिल्हा-निहाय अस्थायी पदांचा वाटप केलेला तक्ता - नागरी सहकारी बँका**

| अ.क्र. | पदनाम | मुंबई | पुणे | कोल्हापूर | एकूण |
|---|---|---|---|---|---|
| १ | विभागीय सहनिबंधक, लेप | --- | --- | --- | --- |
| २ | सहनिबंधक | --- | --- | --- | --- |
| ३ | विशेष लेखापरीक्षक, वर्ग-१ | १ | --- | --- | **१** |
| ४ | विशेष लेखापरीक्षक, वर्ग-२ | ५ | २ | १ | ८ |
| ५ | लेखापरीक्षक, श्रेणी-१ | --- | --- | --- | **---** |
| ६ | लेखापरीक्षक, श्रेणी-२ | ९ | २ | १ | **१२** |
| ७ | लघुलेखक | --- | --- | --- | **---** |
| ८ | उपलेखापरीक्षक | १२ | ४ | २ | **१८** |
| ९ | कनिष्ठ लिपीक | ११ | २ | २ | **१५** |
| १० | शिपाई | २ | २ | १ | **५** |
| **एकूण** | | **४०** | **१२** | **७** | **५९** |

Ramesh Shankarrao Shingte

Digitally signed by Ramesh Shankarrao Shingte
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Co- Operation, Marketing And Textile Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fed1b2ed6e1e4aca719170d9eae8aa251ee28dc56c75d8a65acb34103d45bd48, cn=Ramesh Shankarrao Shingte
Date: 2018.09.24 16:25:03 +05'30'

**( रमेश शिंगटे )**

अवर सचिव तथा सहनिबंधक, महाराष्ट्र शासन